# मित्रांनो रामराम!

(ब्रिटिश न्यायालयाने एक विरुद्ध दोन मतांनी सावरकरांना भारतात पाठवावे असा निर्णय दिला. त्याप्रमाणे सावरकरांना हिंदुस्थानात पाठवायचे ठरले. त्याच रात्री सावरकरांनी, त्यांच्या पॅरीस नि लंडनमधील मित्रांना शेवटचा म्हणून जो संदेश पाठविला तो चिरंतन महत्वाचा संदेश असा--)

## निरोप

दिव्य मातृसेवाव्रताच्या दैव दीक्षेत सहभागी झाल्यामुळे अधिकाधिक मधुर होत गेलेल्या मधुमय मैत्रीच्या रेशमी धाग्यांनी ज्यांची हृदये एकमेकांच्या हृदयाशी निगडित झाली आहेत, अशा सुहृदांनो, तुम्हाला हा माझा अखेरचा प्रणाम! आपल्या नाजुक स्पर्शाने कळ्यातील सुवासाला हळूच जागे करणाऱ्या प्रातःकाळच्या दवबिंदूप्रमाणे हळुवार नि स्नेहशीतल असा हा निरोप घेताना सुहृदांनो, माझा हा अखेरचा प्रणाम!

### नियत कर्तव्य

ईश्वराने योजून दिलेली नियत कर्तव्ये पार पाडण्यासाठीच आपला वियोग होत आहे. ही कर्तव्ये करीत असताना केव्हा आपण खदिरांगार खडकांवर खिळले जाऊ तर केव्हा कीर्तीच्या उत्तुंग नि उसळत्या लाटांवर आरूढ होऊ; केव्हा क्षणार्धात दृश्यमान होऊ तर केव्हा क्षणार्धात दृष्टीआड जाऊ; केव्हा अवनतीचा खोल तळ गाठू तर केव्हा उन्नतीचे अुंच शिखर सर करू, जे जे स्थान त्या गणनायकाने आपल्याला दिले असेल. ते ते स्थान हेच सर्वोत्कृष्ट मानू आणि त्या स्थानी नेमून दिलेले कार्य हे अशा रीतीने बजावू की जणू काही तेच आपले एकमेव जीवनकार्य!

### ऐतिहासिक रंगमंच

एखाद्या पौर्वात्य महाकवीच्या भव्योदात्त नाटकामध्ये भरतवाक्याच्या वेळी नाटकातील मृत आणि जिवंत अशी सर्वच पात्रे जशी एकत्र जमतात, त्याचप्रमाणे आपण आपण सर्व असंख्य नट इतिहासाच्या विशाल रंगमंचावर जेव्हा पुन्हा एकदा एकत्र येऊ आणि आपल्याला टाळी देणाऱ्या अखिल मानवजातीच्या प्रेक्षक समूहापुढे उभे राहू तेव्हा त्या प्रेक्षकवृदांने केलेल्या जयघोषामुळे साऱ्या दऱ्याखोऱ्या निनादून जातील.

तोपर्यंत माझ्या प्रिय सुहृदांनो, माझा हा अखेरचा प्रणाम!

## मानवजातीला मार्गदर्शन

माझ्या अतिनम्र अस्थी अखेरीस कोठेही पडोत-सभोवतालच्या भयाणतेत भेसूर  स्वराची भर टाकणाऱ्या नि उदास आक्रंदन करीत वाहत जाणाऱ्या अंदमानच्या एखाद्या उदासवाण्या ओढ्यात त्या विखुरल्या गेलेल्या असोत किंवा मध्यरात्री आकाशीच्या चांदण्या जिच्या स्पुटिकशुभ्र पावन प्रवाहात नृत्याचा फेर धरतात त्या पवित्र गंगा नदीत त्या टाकलेल्या असोत- माझ्या त्या अस्थी पुन्हा चैतन्याने सळसळण्याचा क्षण एकदा निश्चित येणार आहे. त्या क्षणी विजयाच्या तुताऱ्या निनादू लागतील नि उच्चरवाने उद्घोष करतील- ‘प्रभू रामचंद्राने आपल्या आवडत्या लोकांच्या मस्तकावर अक्षय विजयाचा सुवर्णमुकुट चढविला आहे! दुष्ट राक्षसाला पार पिटाळून लावण्यात आले आहे नि ज्या सागरकुहरातून तो प्रथम बाहेर पडला होता त्या सागरातच त्याला कायमची जलसमाधी देण्यात आली आहे. आणि पाहा ही आपली भारतमाता  येथे  विजयवैभवाने  विभूषित होऊन उभी आहे! ही दीप-देवता  अखिल मानवजातीला  मार्ग दाखवीत तेजाने तळपू लागली आहे! उठा- हौतात्म्य स्विकारलेल्या संतांनो नि सैनिकांनो जागे व्हा! ज्या युद्धात तुम्ही लढलात नि धारातीर्थी पडलात ते युद्ध आपण जिंकले आहे!‘ विजयतुताऱ्याची ही गर्जना ज्या क्षणी वातावरणात दुमदुमेल त्याक्षणीच माझ्या अस्थीत पुन्हा प्राणाग्नी संचरून त्या प्रदीप्त होतील! तोपर्यंत माझ्या प्रिय सुहृदांनो!  माझा हा अखेरचा प्रणाम!

## आत्मत्याग हा नियम

``डोळ्यांत तेल घालून आपल्या राष्ट्रमातेच्या प्रगतीवर जागरूक लक्ष ठेवा. इतके कार्य झाले किंवा इतका प्रयत्न केला या मोजमापावर प्रगतीचे मूल्य ठरवू नका; तर आपल्या लोकांनी किती क्लेश सोसले नि किती आत्मत्याग ते सतत करू शकले या कसोटीवर त्या प्रगतीचे मूल्यमापन करायला शिका. कारण कार्यनिष्पत्ती हा योगायोग आहे; परंतु आत्मत्याग हा नियम आहे. आत्मत्यागाच्या खंबीर पायावरच अभिनव नि अतिभव्य राज्यांची विभवमंदिरे उभी राहतात. हुतात्म्यांच्या रक्षेत रुजलेले राज्यवृक्षच विस्तीर्ण वाढतात, विभवसंपन्न होतात.ईश्वराने दिलेला प्राण त्याच्या चरणी पुन्हा अर्पण करीपर्यंत नि ईश्वरी कार्याची परिपूर्तता होईपर्यंत अशा अभिनिवेशाने कार्य करीत राहा की एकतर हुतात्म्याची पुष्पमाला तरी मस्तकावर मिरवाल किंवा विजयाचा तेजोमुकुट तरी जिंकून घ्याल! येतो! प्रिय सुहृदांनो! माझा हा अखेरचा प्रणाम स्वीकारा!``

**वंदेमातरम!**